**राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत श्री संत गाडगेबाबा दूध उत्पादक व प्रक्रिया सहकारी संस्था मर्या.,घाटपुरी, जि.बुलढाणा यांना वेगवर्धक दुग्धविकास कार्यक्रमाअंतर्गत मंजूर करण्यात आलेला प्रकल्प रद्द (Desanctioned) करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राकृवि २०११ /प्र.क्र.२५१/पदुम-८**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२,**
तारीख: १ एप्रिल, २०१५

<u>वाचा</u> - १) शासन निर्णय क्रमांकः एमएलके २०११/प्र.क्र.२५१/पदुम ८, दिनांक ८.१२.२०११
२) आयुक्त दुग्धव्यवसाय विकास यांचे क्र. आदुवि-६/संत गाडगेबाबा/ रिट पिटीशन/ २०१२-१३/६७, दि.२७.२.२०१५ चे पत्र

**शासन निर्णय -**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत वेगवर्धक दुग्धविकास कार्यक्रमाखाली श्री संत गाडगेबाबा दूध उत्पादक व प्रक्रिया सहकारी संस्था मर्या., घाटपुरी, जि.बुलढाणा यांना संदर्भाधिन शासन निर्णयान्वये रु.२१९.०० लक्ष इतका राकृवियो हिस्सा व रु.२०.०० लक्ष इतका संघ हिस्सा असा रु.२७३.५९ लक्ष किंमतीचा प्रकल्प मंजूर करण्यात आला होता. दिनांक ७.३.२०१२ रोजी सचिव (पदुम) यांच्याकडील आढावा बैठकीत प्रादेशिक दुग्धविकास अधिकारी, अमरावती यांनी श्री संत गाडगेबाबा दूध उत्पादक व प्रक्रिया सहकारी संस्था मर्या., घाटपुरी, जि. बुलढाणा या संस्थेने पुरविलेली माहिती खोटी असल्याचे व संस्थेचे कामकाज बंद असल्याचे सांगितल्याने सचिव (पदुम) यांच्या निर्देशानुसार सदर संस्थेस दिलेला निधी व्याजासहित वसूल करुन घेण्याबाबत कार्यवाही आयुक्त दुग्धव्यवसाय विकास यांच्यास्तरावरुन करण्यात आली. सदर कार्यवाही विरुध्द संत गाडगेबाबा दूध उत्पादक व प्रक्रिया संघ, बुलढाणा यांनी मा.उच्च न्यायालयात रिट पिटीशन क्र.४०७६/२०१२ दाखल केली होती. मा. उच्च न्यायालयाने सदर प्रकरण अंतिम सुनावणीअंती दि.८.७.२०१४ रोजी खारीज केले आहे. सदर निर्णयास अनुसरुन आयुक्त दुग्धव्यवसाय विकास यांनी संदर्भ क्र. २ अन्वये श्री संत गाडगेबाबा दूध उत्पादक व प्रक्रिया सहकारी संस्था मर्या., घाटपुरी, जि.बुलढाणा या संघाचा राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत मंजूर प्रस्ताव नामंजूर करण्याबाबत विनंती केली आहे. सदर विनंती व मा.उच्च न्यायलयाच्या निर्णयास अनुसरुन संदर्भ क्र.१ अन्वये मंजूर करण्यात आलेला श्री संत गाडगेबाबा दूध उत्पादक व प्रक्रिया सहकारी संस्था मर्या., घाटपुरी, जि. बुलढाणा या संस्थेचा प्रस्ताव रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन या निर्णयान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत वेगवर्धक दुग्धविकास कार्यक्रमाखाली श्री संत गाडगेबाबा दूध उत्पादक व प्रक्रिया सहकारी संस्था मर्या.,घाटपुरी, जि.बुलढाणा यांना संदर्भ क्र.१ अन्वये मंजूर करण्यात आलेला प्रकल्प रद्द करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४०११११३५१७९००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shashank Madhav Sathe

Digitally signed by Shashank Madhav Sathe
DN: CN = Shashank Madhav Sathe, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.04.01 11:46:30 +05'30'

**(श.मा.साठे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. अपर मुख्य सचिव (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२. सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मुंबई
३. आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे
४. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई-४०० ०१८
६. प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, अमरावती विभाग, अमरावती
७. विभागीय उपनिबंधक सहकारी संस्था (दुग्ध) अमरावती विभाग, अमरावती
८. जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी,बुलढाणा
९. दुग्धशाळा व्यवस्थापक, शासकीय दूध योजना, बुलढाणा
१०.जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, बुलढाणा
११.जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी, बुलढाणा
१२.व्यवस्थापक, श्री. संत गाडगेबाबा दूध उत्पादक व प्रक्रिया सहकारी संस्था मर्या., घाटपुरी, जि.बुलढाणा.
१३.महालेखापाल १/२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), मुंबई/ नागपूर
१४.कक्ष अधिकारी, राकृवियो कक्ष, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.निवड नस्ती